शासकीय विश्रामधामे/विश्रामगृहे, व्ही.आय.पी.रेस्ट हाऊसेस, आमदार निवास मुंबई/नागपूर,रविभवन, नागपूर येथील कुटीरे, इत्यादींचे सुधारित भाडे.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- आरक्षण-२००९/प्र.क्र.८०/मिव्य-२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांकः- १८ जानेवारी,२०१०**

वाचा:- १)शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. आरक्षण-२००१/प्र.क्र.७७/मिव्य-२, दिनांक १९ ऑक्टोबर,२००२.

२) शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. आरक्षण-२००२/प्र.क्र.१२६/मिव्य-२, दिनांक ३१ जुलै, २००३.

**प्रस्तावना:-**शासकीय कामानिमित्त दौ-यावर असणारे राज्य शासनाचे, केंद्र शासनाचे मा.मंत्री महोदय/अति महत्वाच्या व्यक्ती/लोकप्रतिनिधी/आमदार/खासदार/शासकीय अतिथी व शासकीय अधिकारी, कर्मचारी यांना दौ-याच्या कालावधीत वास्तव्यासाठी शासनातर्फे विश्रामगृहे, विश्रामधामे तसेच आमदार निवास, मुंबई/नागपूर येथील कक्षबंध उपलब्ध करुन देण्यात येतात. शासकीय विश्रामगृहे/विश्रामधामांची देखभाल, दुरुस्ती व परिरक्षणाच्या तसेच इतर नित्याच्या खर्चात वाढ झाल्याने, निवासी शुल्काच्या प्रचलित दरात वाढ करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**वरील बाबींचा सांगोपांग विचार करुन शासनाने असा निर्णय घेतला आहे की, शासकीय विश्रामगृहे, विश्रामधामे, आमदार निवास, मुंबई/नागपूर इत्यादी मधील कक्षांच्या दैनंदिन भाडयाचे दर सोबत जोडलेल्या परिशिष्टात नमुद केल्याप्रमाणे दिनांक १ फेब्रवारी,२०१० पासून लागू करण्यात येतील.

२.आरक्षणाच्या अटी व शर्ती खालीलप्रमाणे असतील.

१) विश्रामकक्षाचे आरक्षण करतांना शासन निर्णय क्रमांक. आरक्षण-२००२/प्र.क्र.१२६/ मिव्य-२, दिनांक ३१ जुलै, २००३ च्या शासन निर्णयानुसार अग्रक्रम देण्यात यावा.

२) कक्षबंधाचे आरक्षण जास्तीत जास्त ७ दिवसांपर्यन्त करण्यात यावे. ७ दिवसापेक्षा जास्त कालावधीसाठी निर्धारित दराच्या दुप्पट दराने शुल्क आकारण्यात यावे.

३) महाबळेश्वर येथील हंगामी कालावधीतील शासकीय विश्रामगृहाचे आरक्षण करतेवेळी मा. आमदार /खासदार, केंद्रीय/राज्य शासकीय कर्मचारी यांचेकडून रु.५००/- व अन्य खाजगी व्यक्तींकडून रु.१०००/ इतकी अनामत रक्कम घेण्यात यावी. ही अनामत रक्कम संबंधित कार्यकारी अभियंता यांनी नमुना फॉर्म तयार करुन आरक्षणापूर्वी आरक्षणार्थीकडून घेण्याची व्यवस्था करावी. ही रक्कम विश्रामगृहाच्या भाडयामधून समायोजित करावी. विश्रामगृहाचे भाडे सदरहू अनामत रक्कमेपेक्षा अधिक झाल्यास अतिरिक्त भाडे संबंधिताकडून वसूल करण्यात यावे व कमी झाल्यास विश्रामगृह

व्यवस्थापकाने/प्रभारी कर्मचा-याने दिलेल्या ना-हरकत प्रमाणपत्राच्या आधारे उर्वरित रक्कम संबंधितास परत करण्यात यावी.

४) महाबळेश्वर वगळता महाराष्ट्रातील इतर सर्व विश्रामगृहातील कक्षांचा ताबा देण्यापूर्वी खाजगी व्यक्तीकडून संपूर्ण कालावधीचे भाडे आगाऊ अनामत म्हणून जमा करुन घ्यावी.

हा शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ०९/१/३१/सा.प्र. दिनांक ४ डिसेंबर,२००९ आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १/व्यय-११/१०,दिनांक ४ जानेवारी, २०१० नुसार दिलेल्या अनुमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या (www.maharashtra.gov.in) वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००११६१३१६५७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( प्र.य.देशमुख)
अधिक्षक अभियंता तथा पदसिध्द उप सचिव

सोबत-परिशिष्ट

प्रति,

* सचिव, महाराष्ट्राचे राज्यपाल, राजभवन, मुंबई,
मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई,
मुख्य सचिव,सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई,
अपर मुख्य सचिव ,सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन,मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय,अपील शाखा,मुंबई
* प्रोथोनोटरी व सिनियर मास्टर,उच्च न्यायालय,मुंबई,
विशेष आयुक्त महाराष्ट्र सदन नवी दिल्ली,
वित्त विभाग,व्यय-६/व्यय-११,मंत्रालय,मुंबई,
सामान्य प्रशासन विभाग, ,मंत्रालय,मुंबई,
महसूल व वन विभाग, ,मंत्रालय,मुंबई,
पाटबंधारे विभाग, ,मंत्रालय,मुंबई,
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
महालेखापाल महाराष्ट्र-१/महाराष्ट्र-२, मुंबई/नागपूर
मुख्यमंत्र्यांचे स्वीय सहायक
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
सर्व कार्यकारी अभियंते सार्वजनिक बांधकाम विभाग/सर्व जिल्हा परिषदा
सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सार्वजनिक बांधकाम विभाग मंत्रालयातील सर्व अधिकारी व कार्यासने,
कार्यासन मिव्य-२ ,सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई, (निवड नस्ती)
सार्वजनिक बांधकाम विभाग मिव्य-१/मिव्य-२ मंत्रालय,मुंबई,
माहिती व जनसंपर्क विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.-

* पत्राद्वारे

## परिशिष्ट

## सार्वजनिक बांधकाम विभागाअंतर्गत राज्यातील भिरभिराळ्या ठिकाणी असलेली विश्रामगृहांचे सुधारित दर दर्शविणारे विवरणपत्र.

(शासन निर्णय क्र.आरक्षण २००९/प्र.क्र.८०/मि.व्य.२,नुसार दिनांक. १.०२.२०१० पासून लागू)

| विश्रामगृहांचा तपशील | केंद्र व राज्य शासनाने शासकीय अतिथी म्हणून घोषित न केलेले अतिमहत्वाच्या व्यक्ती / मंत्री /न्यायमूर्ती/ राज्यमंत्री /विधान मंडळाच्या समितीचे सभासद, खासदार / आमदार राज्य शासनाचे शासकीय कामानिमित्त दौ-यांवर असणारे अधिकारी व कर्मचारी जिल्हा परिषदांचे पदाधिकारी, अधिस्वीकृत पत्रकार/ राज्य शासनाच्या समित्यांचे अशासकीय सभासद | केंद्र व इतर राज्य शासनाच्या कामा निमित्त दौ-यावर असणारे अधिकारी /कर्मचारी, माजी आमदार खासदार राज्य शासनाचे अधिकारी/ कर्मचारी कामावर नसतांना व राज्य शासनाचे निवृत्त अधिकारी /कर्मचारी | इतर/ खाजगी व्यक्तीसाठी (साधे कक्ष) | इतर/खाजगी व्यक्तीसाठी (वातानुकूलित कक्ष) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| | दर प्रतिदिन | दर प्रतिदिन | दर प्रतिदिन | दर प्रतिदिन |
| १) मुंबई येथील विश्रामगृहे | रु.१००/- प्रति व्यक्ती | रु. ३००/- प्रति व्यक्ती | रु. १०००/- प्रति कक्ष | रु. १५००/- प्रति कक्ष |
| २-अ) रविभवन नागपूर येथील कक्ष | रु. १००/- प्रति व्यक्ती | रु. ३००/- प्रति व्यक्ती | रु. १०००/- प्रति कक्ष | रु. १५००/- प्रति कक्ष |
| २-ब) रविभवन नागपूर येथील कुटिरे | रु. ५००/- प्रति कुटीर | रु. १५००/- प्रति कुटीर | रु. ४०००/- प्रति कुटीर | रु. ५०००/ प्रति कुटीर |
| ३-अ) महाबळेश्वर येथील कक्ष | रु. १००/- प्रति व्यक्ती | रु. २००/- प्रति व्यक्ती | रु. १५००/- प्रति कक्ष | रु.२०००/- प्रति कक्ष |
| ३-ब) महाबळेश्वर येथील विशेष कक्ष / व्ही.आय.पी. सुटस् | रु. १५०/- प्रति व्यक्ती | रु. २५०/- प्रति व्यक्ती | रु. २०००/- प्रति कक्ष | रु. ३०००/- प्रति कक्ष |

| १ | २ | ३ | ४ | ५ |
|---|---|---|---|---|
| ४) व्हीआयपी गेस्ट हाउस/ सर्कीट हाउस/महसूल मुख्यालयाच्या ठिकाणची विश्रामगृहे | रु. १००/- प्रति व्यक्ती | रु. ३००/- प्रति व्यक्ती | रु. १०००/- प्रति कक्ष | रु. १५००/- प्रति कक्ष |
| ५) आमदार निवास मुंबई / नागपूर | रु. १००/- प्रति व्यक्ती | रु. ३००/- प्रति व्यक्ती | रु. १०००/- प्रति कक्ष | रु. १५००/- प्रति कक्ष |
| ६) वरील अनु क्र.४ मधील महसूल मुख्यालये वगळून इतर जिल्हयांच्या ठिकाणी असलेली विश्रामगृहे | रु. १००/- प्रति व्यक्ती | रु. २००/- प्रति व्यक्ती | रु. ७५०/- प्रति कक्ष | रु. १०००/- प्रति कक्ष |
| ७)खंडाळा, माथेरान,खुल्दाबाद, चिखलदरा येथील विश्रामगृहे | रु. १००/- प्रति व्यक्ती | रु. २००/- प्रति व्यक्ती | रु. ७५०/- प्रति कक्ष | रु. १०००/- प्रति कक्ष |
| ८) तालुका व इतर ठिकाणची विश्रामगृहे | रु. ७५/- प्रति व्यक्ती | रु. १५०/- प्रति व्यक्ती | रु. ४००/- प्रति कक्ष | रु. ८००/- प्रति कक्ष |

(प्र.य.देशमुख)
अधिक्षक अभियंता व पदसिध्द उप सचिव

---------